**सन २०१४-१५ करिता राज्य योजनेतंर्गत ठोक तरतुदीतून सातारा वनविभागामध्ये मृद संधारणाच्या कामांकरिताचा रु.५९.८९ लक्ष रक्कमेचा नवीन बाब प्रस्ताव.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एफडीएम-२०१४/प्र.क्र.११७/फ-२**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २४ मार्च, २०१५

वाचा :-

१) नियोजन विभागाचे अ.शा.पत्र क्र.संकीर्ण-२०१४/प्र.क्र.२७/का-१४११, दि.२९.०५.२०१४.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.०१.०७.२०१४
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२१(२)(१४-१५)/७८६, दि.०५.०८.२०१४.
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.एफडीएम-२०१४/प्र.क्र.११७/फ-२, दि.०५.०९.२०१४
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/ अर्थसंकल्प-३, दि.०९.०२.२०१५.

**प्रस्तावना :-**

सन २०१४-१५ करिता राज्य योजनाअंतर्गत योजनेकरिता कोल्हापूर वनवृत्ताअंतर्गत सातारा वनविभागातील महाबळेश्वर व कराड वनपरिक्षेत्रात साठवण बंधारा / वनतळी बांधणे इ. विकास कामासाठी मा.मुख्यमंत्री महोदयांच्या निदेशानुसार, नियोजन विभागाने संदर्भ क्र.१ वरील दि.२९.०५.२०१४ च्या अर्ध शासकीय पत्रान्वये ठोक तरतूदीतून एकूण रु.६०.०० लक्ष इतका नियतव्यय जल व मृद संधारण क्षेत्राअंतर्गत "मृद संधारणासाठी वनरोपण" (४४०६ ००४४) योजनेअंतर्गत उपलब्ध करुन दिलेला आहे. सदरहू नियतव्ययाच्या अनुषंगाने सन २०१४ च्या पावसाळी (दुस-या) अधिवेशनामध्ये सदरहू रु.६०.०० लक्ष इतका निधी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

सदर मंजूर नियतव्ययाच्या अनुषंगाने प्रस्तावांतर्गत रु.५९.८९ लक्ष रक्कमेपैकी रु.३५.९३ लक्ष इतकी रक्कम अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना संदर्भ क्र.४ वरील दि.०५.०९.२०१४ च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेली असून उर्वरित निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून संदर्भ क्र.३ वरील दि.०५.०८.२०१४ अन्वये प्राप्त झालेला प्रस्ताव विचारात घेता, प्रस्तावांतर्गत रक्कमेपैकी रु.३५.९३ लक्ष इतकी रक्कम वितरीत केल्यानंतर उर्वरित रु.२३.९६ लक्ष **(०२ मजुरी - रु.१९.१६ लक्ष व २१ पुरवठा व सामग्री - रु.४.८० लक्ष, एकूण = रु.२३.९६ लक्ष)** इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची पुनरूक्ती होणार नाही तसेच मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच संदर्भ क्र.२ येथील दि.०१.०७.२०१४ रोजीच्या वित्त विभागाच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तीची पूतर्ता करण्यात येईल याची देखिल दक्षता घ्यावी.

सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.सी-१०, प्रधान शीर्ष - ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, १०१ वनसंरक्षण विकास व पुननिर्मिती, (००)(०२) मृद संधारणासाठी वनरोपण (४४०६ ००४४) या लेखा शिर्षाअंतर्गत सन २०१४-१५ मध्ये मंजुर होणा-या अनुदानातुन भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे दि.०२.०१.२०१५ रोजीचे परिपत्रक आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५.०५.२००९ भाग पहिला उपविभाग-३ परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२४१४४५४९४७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.03.24 14:59:42 +05'30'

**(द.ल.थोरात)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति :-** १) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर.
४) उप वनसंरक्षक, सातारा वनविभाग, सातारा.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
७) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
८) जिल्हा कोषागार अधिकारी कोल्हापूर / सातारा
९) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१०) निवडनस्ती, फ-२ कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.